समग्र शिक्षा या केंद्रपुरस्कृतयोजनेंतर्गत शिक्षक शिक्षण या योजनेसाठी सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षातील अनुसूचित जाती उपयोजना लेखाशीर्षांतर्गत निधी वितरण करण्याबाबत.

केंद्र हिस्सा (२२०२ आय ७४६)

राज्य हिस्सा (२२०२ आय ७५५)

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः निधिवि-२०२१/प्र.क्र.३८/प्रशिक्षण**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- ९ सप्टेंबर, २०२१

**वाचा -**

१) मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ क्र. ७-४/२०२१-आय एस -१२ ( एससी ) दिनांक १४ मे, २०२१

२) राज्य शैक्षणीक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांचे क्र. सेवापूर्व शिक्षण-३/ तरतूद वितरण/ २०२१-२२/१६०६, दि. २०.५.२०२१

३) सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२१/प्र.क्र. १०/ अर्थसंकल्प (विघयो), दि. २६ आगस्ट, २०२१

४) सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. बीजीटी-२०२१/प्र.क्र. १०/ अर्थसंकल्प (विघयो) , दि. ०१ सप्टेंबर २०२१

**प्रस्तावना -**

सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत अनुसूचित जाती उपयोजना लेखाशीर्षांतर्गत दिनांक १४ मे, २०२१ च्या पत्रान्वये रु.७५.०४ लाख इतका निधी तदर्थ स्वरूपात वितरीत केला आहे. त्याअनुषंगानेसामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाने संदर्भ क्र. २ च्या दि. २६.८.२०२१ च्या शासन निर्णयान्वये व संदर्भ क्र. ३ च्या दि. ०१ सप्टेंबर २०२१च्या शासन शुध्दीपत्रकान्वये, वित्त विभागाची मान्यता व अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेल्या निधीनुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित निधीच्या मर्यादेत लेखाशीर्ष २२०२ आय ७४६ (केंद्र हिस्सा ) ६०% खाली रु. ५३.७० लाख व लेखाशीर्ष २२०२ आय ७५५ (राज्य हिस्सा ४० %) खाली रु. ४.३० लाख असा एकुण रु. ५८.०० लाख इतका निधीवितरीत करण्यास मान्यता दिली आहे. सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्रपुरस्कृत योजनेअंतर्गत अनुसूचित जाती उपयोजना लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित निधीच्या मर्यादेत लेखाशीर्ष २२०२ आय ७४६ (केंद्र हिस्सा ) ६०% खाली रु. ५३.७० लाख व लेखाशीर्ष २२०२ आय ७५५

(राज्य हिस्सा ४० %) खाली रु. ४.३० लाख असा एकुण रु. ५८.०० लाख इतका निधी खालील तक्त्यात नमुद उद्दिष्टांकरिता अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

**(SCSP Head) अनुसूचित जाती लेखाशीर्ष**

**(रु. हजारात)**

| **उद्दिष्ट** | **वितरीत करावयाची तरतुद** | |
|---|---|---|
| | केंद्र हिस्सा (२२०२।७४६) | राज्य हिस्सा (२२०२।७५५) |
| ०१ वेतन | ५२५० | ३५० |
| ०६ दूरध्वनी.वीज,पाणी | ६० | ४० |
| १३ कार्या.खर्च | ६० | ४० |
| **एकूण** | ५३७० | ४३० |

केंद्र शासनाने सन-२०२१-२०२२ या आर्थिक वर्षासाठी तदर्थ स्वरूपात वितरीत केलेल्या रु. ७५.०४ लाख निधीपैकी रु.५३.७० लाखइतका निधी मागणी क्र.एन-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसुचीत जातींसाठी विशेष घटक योजना, (०१)अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०३) समग्र शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा ६० टक्के ) (कार्यक्रम)(२२०२।७४६) या लेखाशीर्षाखाली व राज्य हिस्सा करिता रु. ४.३० लाख इतका निधी मागणी क्र.एन-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसुचीत जातींसाठी विशेष घटक योजना, (०१)अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०३) समग्र शिक्षा अभियान (राज्य हिस्सा४० टक्के) (कार्यक्रम) (२२०२।७५५)या लेखाशीर्षाखालीसन-२०२१-२०२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्रपुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, ज्या उद्दिष्टासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात यावा. सदर योजनेतील लाभार्थ्यांची माहिती MPSIMS वर अद्ययावत करण्यात यावीत.

तसेच, वित्त विभागाच्या ०६.४.२०२१ व दि. २४.०६.२०२१ च्या शासन निर्णयातील पत्रामधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय सामाजिक न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १००\/अर्थसंकल्प दि.१५.०६.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०९१३१२२४२५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA
SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2021.09.09 13:14:57 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र शासन, पुणे
८. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
९. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्रपुणे
१०.शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक), महाराष्ट्र राज्य पुणे
११.संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
११.महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
१३.सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (DIET)
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५.वित्त विभाग (व्यय-५/१४/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
१६.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प (विघयो)),सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८.निवडनस्ती (प्रशिक्षण)